**प्रधानमंत्री पीक विमा योजनेअंतर्गत खरीप हंगाम सन २०२२ साठी पिक विमा हप्त्यापोटी उर्वरीत राज्य हिस्सा अनुदान रु. २४४,८६,२५,८६९/- इतकी रक्कम विमा कंपन्यांस अदा करण्यासाठी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.९३/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १ मार्च, २०२३.

**वाचा:-**

१) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.७२/११- अे, दि.१.०७.२०२२
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.४.०४.२०२२
३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.९३/११- अे, दि.२४.०८.२०२२
४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.९३/११- अे, दि.१३.०१.२०२३
५) विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी यांचे पत्र क्र. AIC.MRO / PMFBY-Kh-२२/१२१४/२२, दि.०२.१२.२०२२
६) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.सां.८/वि.ह.अनु./खरीप २२/३४०४/२०२३, दि.३१.०१.२०२३

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०२२ व रब्बी हंगाम २०२२-२३ शासन निर्णय दि.१.०७.२०२२ अन्वये भारतीय कृषि विमा कंपनी, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इंशुरन्स कं.लि., बजाज अलियांझ जनरल इन्शुरन्स कंपनी ,एचडीएफसी इर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी व युनायटेड इंडिया इन्शुरन्स कंपनी या ५ विमा कंपनींमार्फत राबविण्यात येत आहे. भारतीय कृषि विमा कंपनी ही राज्यात विमा कंपन्यांची समन्वयक कंपनी आहे. भारतीय कृषि विमा कंपनीने आयुक्त(कृषी) यांचे मार्फत प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०२२ अंतर्गत उपरोक्त ५ कंपन्यांचा एकत्रित मिळून पिक विमा हप्त्यापोटी उर्वरीत राज्य हिस्सा अनुदान उपलब्ध करून देण्याची मागणी केलेली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये रु.७२४.५२ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र. (६) च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरून खरीप हंगाम २०२२ करीता रु. २४४,८६,२५,८६९/- इतकी रक्कम पिक विमा हप्त्यापोटी उर्वरीत राज्य हिस्सा अनुदान विमा कंपन्यांस अदा करण्यासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतीय कृषि विमा कंपनीने सादर केलेली मागणी आणि तद्नुषंगाने कृषि आयुक्तालयाची शिफारस विचार करता प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०२२ अंतर्गत भारतीय कृषि विमा कंपनी, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इंशुरन्स कं.लि., बजाज अलियांझ जनरल इन्शुरन्स कंपनी, एचडीएफसी इर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी व युनायटेड इंडिया इन्शुरन्स कंपनी या ५ विमा कंपन्यांना

पिक विमा हप्त्यापोटी उर्वरीत राज्य हिस्सा अनुदान रु. २४४,८६,२५,८६९/-(अक्षरी रक्कम रु. दोनशे चव्वेचाळीस कोटी शहाऐंशी लाख पंचवीस हजार आठशे एकोणसत्तर फक्त) इतकी रक्कम खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

## खरीप हंगाम २०२२

| विमा कंपनी | एकूण देय राज्य हिस्सा विमा हप्ता रक्कम (रु) | विमा कंपन्यांना यापुर्वी वितरीत राज्य हिस्सा अनुदान (रु.) | वितरीत करण्यात येणारी राज्य हिस्सा रक्कम (रु.) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| भारतीय कृषि विमा कंपनी | ८९९३४३१३०८ | ७७९४४८९३१५ | ११७८६२४९४५ |
| बजाज अलियांझ जनरल इं.कं.लि. | २१९११२७९९३ | १५१६०८७७३६ | १०३०७०५०५ |
| एचडीएफसी इर्गो जनरल इं.कं.लि | २११०५४४४३५ | १७१६३८४३४६ | ३३९४४१५२९ |
| आयसीआयसीआय लोंबार्ड ज. इं. | २७००५७४४७१ | २२४०५५९३६८ | ४२४३७२३५५ |
| युनायटेड इंडिया इन्शुरन्स कंपनी | २८१४२०४६३३ | २३९९४१०५८५ | ४०३११६५३५ |
| **एकूण खरीप हंगाम २०२१** | **१८८०९८८२८४०** | **१५६६६९३१३५०** | **२४४८६२५८६९** |

२. सदरची रक्कम खरीप हंगाम २०२२ करीता वितरीत करण्यात येत असून त्याचा वापर यापर्वीच्या इतर हंगामाकरीता अनुज्ञेय असणार नाही.

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर, ३३- अर्थसहाय्य.**

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनां व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णयानुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

५. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग अनौप. संदर्भ क्र. ४१/२०२३/व्यय-१, दि.१०.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०२११५४२३८३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.03.02 11:58:33 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१)मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२)प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
३)आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४)संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५)मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६)संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७)सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८)जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९)महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०)वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
११)सह सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२)कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१३)विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, नवीन स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३.
१४)विभागीय व्यवस्थापक, बजाज अलियान्झ जनरल इंशुरंस कं. लि. कॉमरझोन १ ला मजला, टॉवर १ समर्थ अशोक मार्ग, येरवडा पुणे-४११००६
१५)विभागीय व्यवस्थापक, एचडीएफसी इर्गो इन्शुरन्स कं. लि. डी-१०३ तीसरा मजला ईटन बिझनेस, डिस्ट्रीक्ट एल.एस.बी. मार्ग भांडूप (पश्चिम), मुंबई- ४०००७८
१६)विभागीय व्यवस्थापक, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इंशुरन्स कं.लि., आयसीआयसीआय हाऊस, ४१४, वीर सावरकर मार्ग, सिध्दीविनायक मंदिराजवळ,प्रभादेवी, मुंबई- ४०० ०२५.
१७)विभागीय व्यवस्थापक, युनायटेड इंडिया इन्शरन्स कंपनी लिमिटेड, ३ रा मजला, काकडे बिझ आयकोन युनिट क्र.२०२ ते २०७, गणेशखिंड मार्ग, शिवाजीनगर, पुणे ४११ ०१६.
१८)निवड नस्ती (कार्यासन ११-अे).